राज्यातील कृषी विद्यापिठांतर्गत शिकविण्यात येणाऱ्या अभ्यासक्रमांना व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १५१७/प्र.क्र.२०/७अे**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,**
**हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक १५ जुलै, २०१७.**

संदर्भ: भारतीय कृषी अनुसंधान परिषदेचे पत्र क्र. Edn /१३/१/२०१६-HRD, दि.६.१०.२०१६.

**प्रस्तावना -**

कृषी शिक्षणाबाबत भारतीय कृषी अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांनी सूचीत केलेली मार्गदर्शक तत्वे/अटी व शर्ती या संपूर्ण देशातील कृषी शिक्षण संस्थांसाठी लागू ठरतात. भारतीय कृषी अनुसंधान परिषदेच्या नियामक मंडळाच्या दिनांक २९/०६/२०१६च्या बैठकीत कृषी शिक्षण क्षेत्रातील खालील (एकूण १२) पदवी अभ्यासक्रमांना व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित करण्यात आले आहे-

कृषी (Agriculture), फलोत्पादन (Horticulture), कृषी अभियांत्रिकी (Agricultural Engineering), वनशास्त्र (Forestry), अन्न तंत्रज्ञान (Food Technology), जैवतंत्रज्ञान (Biotechnology), पशुवैद्यक आणि प्राणि शास्त्र (Veterinary & Animal Science), दुग्धशाळा तंत्रज्ञान (Dairy Technology), रेशीम किडे शास्त्र (Sericulture), मत्स्यविज्ञान (Fisheries), गृह विज्ञान /सामाजिक विज्ञान (Home/Community Science) आणि अन्न व पोषण आहार शास्त्र (Food Nutrition & Dietetics)

त्यानुषंगाने राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत व्यावसायिक अभ्यासक्रम घोषित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

कृषी शिक्षणाबाबत भारतीय कृषी अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांनी सूचीत केल्यानुसार कृषी शिक्षण क्षेत्रातील खालील (एकूण ९) अभ्यासक्रम व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित करण्यात येत आहेत-

१) कृषी (Agriculture)
२) फलोत्पादन (Horticulture)
३) कृषी अभियांत्रिकी (Agricultural Engineering)
४) वनशास्त्र (Forestry)

५) अन्न तंत्रज्ञान (Food Technology)
६) जैवतंत्रज्ञान (Biotechnology)
७) रेशीम किडे शास्त्र (Sericulture)
८) गृह विज्ञान /सामाजिक विज्ञान (Home/ Community Science)
९) अन्न व पोषण आहार शास्त्र (Food Nutrition & Dietetics)

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१५१७४८४०६६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.07.19 17:32:34 +05'30'

**(प्र.शं. शेटे)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (कृषि) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.राज्यमंत्री (कृषि) याचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा.मुख्य सचिव याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (कृषि), याचे स्विय सहाय्यक, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (पदुम), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे.
१०.महासंचालक, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, १३२/ब, भांबुर्डा, भोसलेनगर, पुणे.
११.कुलगुरु/कुलसचिव, डॉ. बाळासाहेब सावंत कोंकण कृषी विद्यापीठ, दापोली.
१२.कुलगुरु/कुलसचिव, डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला.
१३.कुलगुरु/कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी.
१४.कुलगुरु/कुलसचिव, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी.
१५.स्वीय सहायक, प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय.
१६.निवडनस्ती.